मागासवर्गीय अनुदानित वसतिगृह मान्यता व अनुदान योजना बंद वसतिगृहे इतर संस्थांना हस्तांतरीत व स्थलांतरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१४/प्र.क्र.०२/शिक्षण २
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ४ सप्टेबर, २०१४

वाचा -

१) **शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्रमांक: बीसीएच-१०९७/प्र.क्र.१०७/मावक-४, दि.१६.०३.१९९८**
२) **शासन शुध्दीपत्रक : सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीसीएच-२०००/प्र.क्र.२९७/मावक-४, दि.०१.०८.२००८**
३) **आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.४६६ दि.१४.०२.२०१४**
४) **आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.२१९२, दि.०३.०९.२०१४**

प्रस्तावना -

स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देण्याची योजना संदर्भाधीन शासन निर्णय दि.१६.०३.१९९८ अन्वये राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत राज्यात २३८८ अनुदानित वसतिगृहांना मान्यता देण्यात आली आहे. त्यांपैकी, भंडारा जिल्हयातील भारतीय आदिवासी शिव शिक्षण संस्था, गराडा, ता. लाखनी, जि. भंडारा संचलित आदिवासी छात्रालय, गराडा, ता. लाखनी, जि. भंडारा व बुलढाणा जिल्हयातील श्री.संत ज्ञानेश्वर बहुउद्देशीय संस्था, दहिद बु., ता. जि.बुलढाणा संचलित जिजाऊ मागासवर्गीय मुलांचे वसतीगृह, दहिद बु., ता. जि.बुलढाणा या वसतीगृहांची मान्यता रद्द केल्यामुळे सदर वसतिगृहे बंद असून इतर पात्र संस्थांना हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन देण्यास उपलब्ध आहेत.

याकरिता मुलींच्या वसतीगृहाची ज्या ठिकाणी मागणी आहे, तेथील मुलींना शिक्षणाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात यास्तव उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदीनुसार सदरहू बंद वसतिगृहे मुलींच्या वसतीगृहात रुपांतरीत करुन इतर पात्र संस्थेस हस्तांतरीत व स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

याबाबत सांगोपांग विचार करून स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देणे या योजनेअंतर्गत बंद असलेली २ अनुदानित वसतिगृहे खालीलप्रमाणे हस्तांतरीत व स्थलांतरित करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

| अ. क्र. | बंद वसतिगृहाचे नाव | हस्तांतरण व स्थलांतरण करण्यात येत असलेल्या संस्थेचे नाव |
|---|---|---|
| १. | भारतीय आदिवासी शिव शिक्षण संस्था, गराडा, ता. लाखनी, जि. भंडारा संचलित आदिवासी छात्रालय, गराडा, ता. लाखनी, जि. भंडारा | रमाई मागासवर्गीय बहुद्देशीय संस्था, काटोल, जि.नागपूर या संस्थेस काटोल, ता.काटोल, जि.नागपूर येथे चालविण्यासाठी |
| २. | श्री.संत ज्ञानेश्वर बहुउद्देशीय संस्था, दहिद बु., ता.जि.बुलढाणा संचलित जिजाऊ मागासवर्गीय मुलांचे वसतीगृह, दहिद बु., ता. जि.बुलढाणा | स्व.मनकर्णाबाई दाजीबा जगताप बहुद्देशीय संस्था, दातोडी, ता. आर्णी, जि. यवतमाळ या संस्थेस आर्णी, ता. आर्णी, जि. यवतमाळ येथे चालविण्यासाठी |

२ सदर बंद अनुदानित वसतिगृहे मुलींच्या वसतिगृहात परावर्तीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यामुळे सदर संस्थांना मुलींचे वसतिगृह चालू करणे बंधनकारक राहील.

३. सदर संस्थांना हस्तांतरीत व स्थलांतरीत केलेल्या वसतिगृहांची मान्यता सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासुन राहील व एकूण मान्यसंख्या २४ इतकी राहील.

४. सदर संस्थांना स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देणे या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४१६१२२७९२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2014.09.16 12:05:42 +05'30'

डॉ.वसंत माने
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, अमरावती/नागपूर
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा/ बुलढाणा/ नागपूर/ यवतमाळ
४. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा/ बुलढाणा/ नागपूर/ यवतमाळ
५. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा/ बुलढाणा/ नागपूर/ यवतमाळ महालेखापाल(लेखापरिक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र ½, मुंबई, नागपूर
६. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव/ अध्यक्ष, रमाई मागासवर्गीय बहुद्देशीय संस्था, काटोल, जि.नागपूर
९. सचिव/ अध्यक्ष, स्व.मनकर्णाबाई दाजीबा जगताप बहुद्देशीय संस्था, दातोडी, ता. जि. यवतमाळ
१०. निवड नस्ती.